# मराठ्यांच्या लढायांचा इतिहास

# पलायनाचा खोखो खेळ

## भाग ४

# पलायनाचा खोखो खेळ

भाग ४

मित्रांनो,

प्रस्तुत लेखमालेत आता कोरेगाव भीमा नदीवरील लढाईचा क्रम कै. शि. म. परांजपे पुस्तकाप्रमाणे आहे. येरवडा लढाई (१६ नोव्हेंबर १८१७) ते कोरेगाव लढाई (१ जानेवारी १८१८) असे ४५ दिवसांचे अंतर आहे. त्या नंतर पुन्हा २० फेब्रुवारी १८१८ च्या अष्ट्याची लढाई पर्यंतच्या ५० दिवसात एकूण ९५ दिवसात दोन्ही फौजा कुठे फिरत होत्या? सेनापती काय आखणी करत होते? फौजेची कूच करायची काय पद्धत होती? यातून दोन्ही बाजूंना काय साध्य करायचे होते?

९५ दिवस सेनेला सतत पळते ठेवण्यात पेशव्यांचे काय हेतू असावेत? इंग्रजी सैन्याने पाठलाग करताना त्यांनी काय उद्देश ठेवले असावेत? वगैरे माहिती एकत्रित करून सादर करत आहे. लढाईच्या घटनेला जबाबदार भौगोलिक रचना, दिवसातील विशिष्ठ वेळ, तात्कालिक

गुप्त राजकारण याचा ओहापोह करायला या भागाची रचना आहे. आपल्या बालपणातील खोखोचा खेळ आठवा. दोन संघात एकावर पळतीचा डाव आहे तर दुसऱ्यावर पकडतीचा डाव आहे. पकडतीच्या संघाला आपापल्यातील खेळाडूंना खो देऊन पळतीच्या खेळाडूंना बाद करायचे आहे. ठराविक वेळात किती गडी बाद केले. यावर जय पराजय ठरतो. पकडतीच्या संघाला पटापट खो देत कमी दमणूक करून पळतीच्या संघाचे खेळाडू सारखे पळते ठेवून दमवून बाद करायच्या चाली रचाव्या लागतात.

कै. शि. म. परांजपे यांनी केलेल्या वर्णनातून राजकीय मैदानात पेशव्यांनी आपणहून पळती स्वीकारली. इंग्रजी सैन्याला झुकांड्या देत राहून दमवून नामोहरम करावे, मधल्या काळात आपल्या बाजूने लढायला गुजरात, कर्नाटक, खानदेश, हैदराबाद भागातील बडे सरदार त्यांच्या सैन्यासह आपल्याला मिळवत रहावे. असे मनात ठेवून वेळ काढू खेळी ते करत राहिले. भरपूर सैन्यबळ, लढाईचे मनाजोगते मैदान मिळेल तिथे इंग्रजी सैन्याला ठोकून काढायचे असा बेत होता. इंग्रजांनी आपल्या सैन्याच्या दूरवरच्या भागातून आणून स्क्वाड्स, प्लाटून्स, कंपनीज्, बटॅलियन, रेजिमेंट यातून तोफा, चपळ सैन्य हालचाली, कल्पक युद्धनिती आणि फंदफितुरीचे डावपेच लढवून पेशव्यांच्या पलायनाचा, वेळकाढूपणाचा भरपूर फायदा घेतला. त्यांच्या नियोजनात त्यांनी नकाशे, घोडदळाची, पायदळाची बदलती मांडणी ठेवून रणांगणात खोलवर शस्त्रे, दारू गोळे पुरवठा करणारी सप्लाय लाईन तयारकरून ठेवणे, धूर्तपणे पेशव्यांची माणसे फोडणे, सातारच्या गादीचे वारसदारात पेशव्यांबाबत संशयाचे जाल पसरवणे, यातून ताळमेळ बसवून पेशव्यांच्या सैन्याला खो घातले,

नामोहरम करत पराजित केले.
संपूर्ण देशाच्या खोखो मैदानावर अनेक इंग्रज विरोधी राज्यसत्ता वेगवेगळ्या भागात इस्ट इंडिया कंपनीच्या इंग्रजी सैन्याला डिवचून सतत दडपणाखाली फिरत ठेवण्याने सेनेचे मनोबल खच्चीकरण करत होत्या. मग इस्ट इंडिया कंपनी मार खाऊन खाऊन वैतागून हिंदुस्थानातून निघून जाईल असे मानले जात होते. शिंदे, होळकर, गायकवाड, भोसले मराठा सरदार कॉन्फिडर्सी संकल्पना मान्य करून पुन्हा एकदा एकत्रित एकछत्री राज्य कारभार मुगलांनी दिल्लीतून करावा. त्यांच्या संरक्षणासाठी मराठा शासन पुण्याहून कारवाई करायची हमी घेईल असे थोरल्या बाजीरावांच्या काळात मुगल सत्तेशी झालेले करार पुन्हा एकदा सुरू करावा वगैरे वगैरे... मनसुबे असावेत.
या राजकीय खो खो खेळात कोण जिंकले याचे उत्तर आपल्याला सन १८१८ ते १९४७ पर्यंतच्या घटनाक्रमातून समजून येते. या आधीच्या भागातून कळले की पर्वतीवर उपस्थित बाजीरावसाहेब १६ नोव्हेंबर १८१७ च्या रात्री अचानक पुणे सोडून निघून गेले. ते कुठे कुठे गेले? त्यांच्या बाजूने लढणारे सैन्य पुण्यातून त्यांच्या मागोमाग जात राहिले. पुणे हे मुख्य केंद्र मानले तर बाजीरावसाहेबांनी पुण्यात यायला २ फेऱ्या मारल्या. दुसरी अर्धवट राहिली असे लक्षात येईल.

१७ नोव्हेंबर रोजी येरवड्याच्या लढाईला अर्धवट सोडून ते जे निघाले. ते ३१ डिसेंबर १८१७ ला कोरेगाव भीमा नदीवर इंग्रजी सेनेला परतवून लावून पुण्यात परतायच्या इरादाने पुण्याच्या अगदी जवळ १५ किमीवर वाघोली पर्यंत आले. ही पहिली फेरी मानता येईल.

१ जानेवारी १८१८ रोजी शिरूरला परत फिरलेल्या इंग्रजी सैन्यावर मागून हल्ले न करता किंवा पुण्यात आपल्या शनिवार वाड्याला ताब्यात घेण्याचा प्रयत्न न करता त्यांचे मत बदलले आणि अचानक दिशा बदलून राजेवाडी, सासवड, सालपे घाट, वाठारच्या आसपास वगैरे करत करत सातारा जवळ माहुलीच्या तीरावर सातारकर गादीचे तात्कालिन वारसदारांना कुटुंबियांसमावेत घेऊन, कराड, मिरज, कर्नाटकात काही गावे पालथी घालत पंढरपूर जवळ दुसऱ्यांदा आले. सोलापूरच्या किल्ल्यात जाऊन तिथून इंग्रजी फौजेला परास्त करायचा बेत होता असे मानले जाते, पण वाटेत माणगंगा व भीमा नदीच्या संगम व गोपाळच्या अष्ट्याच्या (अष्टे, अष्टी असेही म्हणतात) टेकडीकडील मैदानात लढाईला तोंड लागले. त्या लढाईत शूर सेनानी बापू गोखले कामी आले. सैन्यातील अनेक सरदार इंग्रजांना मिळाले. सातारा गादीचे वारसदार इंग्रजांना मिळाले. बाजीरावसाहेबांना दि २० फेब्रुवारी १८१८ रोजी आपल्या घरच्या नातलगांसकट गिरफ्तार व्हावे लागले. अशा प्रकारे बाजीरावसाहेबांची पळती वणवण थांबली. कालांतराने त्यांना उत्तर भारतात बिठूरला (ब्रह्मावर्त) कैदवासात पाठवले गेले. इतर भागातील पेशव्यांचे ताब्यातील गड, किल्ले लढले आणि पडले. आणि शेवटी ३ जून १८१८ ला बाजीरावांनी धुळकोट येथे रीतसर शरणागती पत्करली. पकडतीच्या बाजूने राजकीय खोखो थांबला.
त्यांच्या दोन फेऱ्या कशा प्रकारे घडल्या यावर नकाशा दर्शनातून प्रकाश टाकला आहे.

पहिल्या फेरीतील धावतीचे तीन तुकडे पाडता येतील

१. १६ नोव्हेंबर पुणे ते ६ डिसेंबर १८१७ पंढरपूर... साधारण अंतर २८२

किमी २० ते २१ दिवसात काटले. म्हणजे दिवसाला सरासरी १५ किमी वेग मानला जाऊ शकतो. त्यातील विश्रांतीचे दिवस वगळले तर १४ दिवसात २८० किमी असे मानले तर साधारण २० किमी वेग पडतो. पुसेसावळीत बेत बदलले.

२. ७ डिसेंबर पंढरपूर ते आळेफाटा - चाकण २९ डिसेंबर १८१७ किमी

३. ३० डिसेबर चाकण ते शिक्रापूर - कोरेगावभीमा ३१ डिसेंबर किमी

दुसऱ्या फेरीतील धावतीचे तीन तुकडे पाडता येतील

१. १ जानेवारी १८१८ कोरेगाव भीमा - राजेवाडी - माहुलीत १७१ किमी. सातारकर गादी वारसांना सहकुटुंब बरोबर घेऊन निघाले.

२. सातारा - कराड - मिरज - कर्नाटकातील काही गावे - कुडची - अथणी- जत - पंढरपूर जवळ दुसऱ्यांना - अष्टी अंतर ३५५ किमी. ता १९ फेब्रूवारी १८१८ पर्यंत कोरे गाव भीमा ते गोपाळाची अष्टी एकूण ४६८ किमी. गणिताला सोपे म्हणून ५० दिवसात ४५० किमी धरले तर जर रोज सरासरी ९ किमी पेक्षा कमी वेगाने जाऊ शकले. १५ दिवसाची विश्रांतीचे धरले तर ३५ दिवसात सरासरी १३ ते १५ किमी वेग पडतो असे मानायला हरकत नाही.

३. २१ फेब्रुवारी ते जून १८१८ दरम्यान मराठ्यांच्या गडावरील किल्लेदार सोडता उरलेले सरदार पांगून सोलापूर, परांडा, निपाणी, मिरज भागात गायब झाले. ३ जून १८१८ ला बाजीरावांनी धुळकोट येथे रीतसर शरणागती पत्करली.

पहिल्या फेरीबद्दल कै शि म परांजपे म्हणतात.

एक बटॅलियन सिंहगडकडे रवाना...

" येरवड्याच्या लढाईनंतर बाजीरावसाहेब आणि बापू गोखले हे पुरंदरच्या बाजला आपल्या बरोबरच्या बऱ्याच मोठ्या सैन्यासह

निघून गेले आणि त्यांच्या सैन्यापैकी काही भाग सिंहगडच्या बाजूकडे वळला. यांनी आपल्या बरोबर कूच करताना बऱ्याच तोफाही घेतलेल्या होत्या. 'कॅप्टन टर्नर' हे या सिंहगडकडील तुकडीचा पाठलाग करण्याकरिता निघाले. ते ता. 19 नोव्हेंबर रोजी संध्याकाळी सिंहगडच्या पायथ्याशी येऊन पोहोचले. त्यांनी सिंहगड येथील पेशव्यांच्या सैन्याचा पराभव करून त्यांच्यापाशी ज्या तोफा होत्या त्या हस्तगत करून घेतल्या. परंतु त्या तोफा पुण्यास परत आणणे शक्य नसल्यामुळे त्यांची नाके तोडून त्या तोफा तेथेच टाकण्यात आल्या; व कॅप्टन टर्नर यांच्या हाताखालचे सैन्य ता. 21 नोव्हेंबर रोजी पुण्यास परत आले".

## पेशव्यांच्या मुख्य सैन्यामागे इंग्रजी फौजा निघाल्या...

१. १६ नोव्हेंबर पुणे ते ६ डिसेंबर १८१७ पंढरपूर... साधारण अंतर २८२ किमी २० ते २१ दिवसात काटले. म्हणजे दिवसाला सरासरी १५ किमी वेग मानला जाऊ शकतो. त्यातील विश्रांतीचे दिवस वगळले तर १४ दिवसात २८० किमी असे मानले तर साधारण २० किमी वेग पडतो. पुसेसावळीत बेत बदलले.

अशा रीतीने सिंहगडकडील या लहानशा तुकडीचा जरी ताबडतोब पाठलाग आणि पराभव करिता आला, तरी पेशव्यांच्या बरोबर जे मुख्य सैन्य पुरंदर किल्ल्याकडे निघून गेलेले होते, ते अद्यापि कायमच होते. त्या सैन्याचा ताबडतोब पाठलाग सुरू करणे ब्रिगेडिअर जनरल स्मिथ यांना शक्य नव्हते. म्हणून ता. 17 नोव्हेंबरच्या येरवड्याच्या लढाईपासून ता. 21 नोव्हेंबरपर्यंतचे मध्यंतरीचे दिवस जनरल स्मिथ यांना आपली तयारी करण्यामध्ये घालविणे भाग पडले. परंतु या मध्यंतरीच्या अवकाशामध्ये बाजीरावसाहेबांच्या सैन्याने पुण्यापासून

बराच लांबचा पल्ला गाठला होता. पेशवे पुरंदरच्या बाजूने प्रथम निघाले, ते तेथून पुढे कूच करीत करीत साताऱ्याजवळ माहुली मुक्कामी (साधारण पणे २१ नोव्हेंबर)... येथे एक हजार आरब आणि दोन हजार घोडेस्वार इतक्या सैन्यासह निपाणीचे अप्पासाहेब निपाणीकर हे बाजीरावसाहेबांच्या सैन्याला येऊन मिळाले. आपला पाठलाग करीत इंग्लिशांचे सैन्य सालप्याच्या घाटाने येत आहे, असे समजून आल्यानंतर त्यांना अडथळा करण्याकरिता काही घोडेस्वार ठेवून बाजीरावसाहेब माहुलीहून (साधारणपणे २५ नोव्हेंबरला) निघून पुसेसावळी येथे ता. 27 नोव्हेंबर रोजी आले;




व तेथे दोन दिवस मुक्काम करून ता २९ नोव्हेंबर रोजी पहाटेस निपाणकर आणि पटवर्धन यांचेकडील पाच हजार घोडेस्वार आपल्याबरोबर घेऊन ते तेथून मिरजेकडे जाण्यास निघाले. त्या वेळी शत्रुला आपला पाठलाग पुढे करता येऊ नये आणि शत्रू मध्येच अडविला जावा, या उद्देशाने बापू गोखले, विंचुरकर आणि घोरपडे

यांच्या हाताखाली पेशव्यांचे मुख्य लष्कर देण्यात आलेले होते. अशी मागची तरतूद करून पेशवे मिरजेकडे जाण्याकरीता निघाले. परंतु बापू गोखले शत्रूला अडवण्याकरीता आपल्या सैन्याशी ज्या डोंगरामध्ये दबा धरून बसले होते, त्या डोंगरांना वळसा घालून इंग्लिशांचे सैन्य ता. 2 डिसेंबर रोजी पुसेसावळी येथे येऊन पोहोचले. त्यामुळे बाजीरावसाहेबांना आपली दिशा बदलणे जरूर झाले.
आत्तापर्यंत पुण्यापासून पुरंदर, माहुली, पुसेसावळी, मिरज या मार्गाने ते दक्षिणेकडे कूच करीत चाललेले होते. परंतु येथून त्यांनी आपली दिशा बदलली आणि उत्तरेकडे पंढरपूरच्या रोखाने त्यांनी आपला मोर्चा फिरवला. (माझ्या मते ते मिरजेला गेले नसावेत कारण ते सरासरीच्या अंतरात बसत नाही. कदाचित काही सरदारांना पुढे पाठवले गेले असेल पण खुद्द बाजीरावसाहेब कडेपूरातून पंढरपुरला (६ दिवसात २० किमी रोज करत अंतर १२० किमी काटणे शक्य वाटते) वळले असावेत) पुढे पेशव्यांचा मुक्काम पंढरपूर येथे साधारणपणे ८ डिसेंबरला असता इंग्लिशांची पलटणे ता. 8 डिसेंबर रोजी पंढरपूरच्या जवळ येऊन पोहोचली.
अशा रीतीने सिंहगडकडील या लहानशा तुकडीचा जरी ताबडतोब पाठलाग आणि पराभव करिता आला, तरी पेशव्यांच्या बरोबर जे मुख्य सैन्य पुरंदर किल्ल्याकडे निघून गेलेले होते, ते अद्यापि कायमच होते. त्या सैन्याचा ताबडतोब पाठलाग सुरू करणे ब्रिगेडिअर जनरल स्मिथ यांना शक्य नव्हते. म्हणून ता. १७ नोव्हेंबरच्या येरवड्याच्या लढाईपासून ता. २१ नोव्हेंबरपर्यंतचे मध्यंतरीचे दिवस जनरल स्मिथ यांना आपली तयारी करण्यामध्ये घालविणे भाग पडले. परंतु या मध्यंतरीच्या अवकाशामध्ये बाजीरावसाहेबांच्या सैन्याने पुण्यापासून

बराच लांबचा पल्ला गाठला होता. पेशवे पुरंदरच्या बाजूने प्रथम निघाले, ते तेथून पुढे कूच करीत करीत साताऱ्याजवळ माहुली मुक्कामी ... येथे एक हजार आरब आणि दोन हजार घोडेस्वार इतक्या सैन्यासह निपाणीचे अप्पासाहेब निपाणीकर हे बाजीरावसाहेबांच्या सैन्याला येऊन मिळाले. आपला पाठलाग करीत इंग्लिशांचे सैन्य सालप्याच्या घाटाने येत आहे, असे समजून आल्यानंतर त्यांना अडथळा करण्याकरिता काही घोडेस्वार ठेवून बाजीरावसाहेब माहुलीहून निघून पुसेसावळी येथे ता. २७ नोव्हेंबर रोजी आले;







व तेथे दोन दिवस मुक्काम करून ता २९ नोव्हेंबर रोजी पहाटेस निपाणकर आणि पटवर्धन यांचेकडील पाच हजार घोडेस्वार

आपल्याबरोबर घेऊन ते तेथून मिरजेकडे जाण्यास निघाले. त्या वेळी शत्रुला आपला पाठलाग पुढे करता येऊ नये आणि शत्रू मध्येच अडविला जावा, या उद्देशाने बापू गोखले, विंचुरकर आणि घोरपडे यांच्या हाताखाली पेशव्यांचे मुख्य लष्कर देण्यात आलेले होते. अशी मागची तरतूद करून पेशवे मिरजेकडे जाण्याकरीता निघाले. परंतु बापू गोखले शत्रूला अडवण्याकरीता आपल्या सैन्याशी ज्या डोंगरामध्ये दबा धरून बसले होते, त्या डोंगरांना वळसा घालून इंग्लिशांचे सैन्य ता. २ डिसेंबर रोजी पुसेसावळी येथे येऊन पोहोचले. त्यामुळे बाजीरावसाहेबांना आपली दिशा बदलणे जरूर झाले. आत्तापर्यंत पुण्यापासून पुरंदर, माहुली, पुसेसावळी, मिरज या मार्गाने ते दक्षिणेकडे कूच करीत चाललेले होते. परंतु येथून त्यांनी आपली दिशा बदलली आणि उत्तरेकडे पंढरपूरच्या रोखाने त्यांनी आपला मोर्चा फिरवला. पुढे पेशव्यांचा मुक्काम पंढरपूर येथे साधारणपणे ६ डिसेंबरला असता इंग्लिशांची पलटणे ता. ८ डिसेंबर रोजी पंढरपूरच्या जवळ येऊन पोहोचली.

पहिल्या फेरीतील धावतीचा दुसरा तुकडा

२. ७ डिसेंबर पंढरपूर ते आळेफाटा - चाकण २९ डिसेंबर १८१७ किमी




पंढरपूरला येताना बापू गोखल्यांच्या सैन्याने इंग्रजी फौजेला फारच सतावून सोडिले; पण इतक्या त्रासातून आणि हालविपत्तीतून इंग्लिशांचे सैन्य पंढरपूरला येऊन पोहोचते आहे, तोच त्यांना अशी बातमी कळली की, बाजीरावसाहेब अहमदनगर जिल्ह्याकडे वळले असून त्यांचा मुक्काम पीरगाव येथे आहे. पण निरा आणि भीमा या नद्या ओलांडून इंग्लिशांचे सैन्य पीरगाव येथे येते, तो तेथील मुक्काम सोडून बाजीरावसाहेब नाशकाकडे निघून गेले. जलदी-जलदीने

मुक्काम बदलून आपण कोणत्या दिशेने कोणीकडे जात आहोत याचा शत्रूला मागमूस लागू न देता बाजीरावसाहेबांनी शत्रूला झुकांड्या देण्याची जी ही पध्दत सुरू केली होती, त्यामुळे त्यांचा पाठलाग करणे इंग्लिश फौजेला फार कठीण पडू लागले म्हणून आता पीरगावाहून बाजीरावसाहेबांच्या पाठीमार लागत नाशकाला जाण्याचे सोडून देऊन कंटाळून ब्रिगेडिअर जनरल स्मिथ यांनी आपला मोर्चा शिरूरकडे वळविला. इतके दिवसपर्यंत जनरल स्मिथ हे आपल्या बरोबर मोठमोठ्या तोफा वगैरे सामान घेऊन फिरत होते. त्यामुळे त्यांना जलदीने पाठलाग करण्याला अडचण पडत होती; म्हणून शिरूर येथे तोफा वगैरे सामान ठेवन सड्या सैन्यानिशी स्मिथसाहेब आपल्या कामगिरीवर फिरून निघाले ते शिरूरहून बाजीरावाचा नाशिकाच्या दिशेने पाठलाग करण्याकरिता प्रवरेच्या काठी संगमनेर येथे येऊन पोहोचले. परंतु तेथे आल्यावर त्यांना असे कळले की, बाजीरावसाहेब हे नाशिककडे मुळीच न वळता मध्यंतरी त्रिंबकजी डेंगळ्यांच्या हाताखालील पायदळाची आणि त्यांची गाठ पडून ते संगमनेरवरून मधला ओझरचा घाट उतरून जुन्नरखेडच्या वाटेने पुण्याकडे फिरून निघून गेले आहेत. ही जी बातमी स्मिथसाहेबाला कळली होती, त्याप्रमाणे खरोखरच बाजीरावसाहेब ओझरचा घाट उतरून जुन्नरखेडच्या रस्त्याने ता. ३० डिसेंबर १८१७ रोजी चाकण येथे येऊन पोहोचले होते. आणि तेथून आता पुणे फक्त आठ नऊ कोसच राहिले होते. त्यामुळे बाजीरावसाहेब आपल्या सगळ्या सैन्यासह फिरून पुण्यात येण्याला फारसा अवकाश राहिला होता, असे नाही.

पहिल्या फेरीतील धावतीचा तिसरा तुकडा

३. ३० डिसेबर चाकण ते कोरेगावभीमा ३१ डिसेंबर १८१७. ३० किमी

ता. १८ नोव्हेंबरपासून ता. 30 डिसेंबरपर्यंतच्या मधल्या सुमारे दीड महिन्याच्या अवकाशामध्ये पुरंदर, सालप्याचा घाट, माहुली, पुसेसावळी, मिरज, पंढरपूर, पीरगाव (पारगाव?), संगमनेर(?), ओझर, जुन्नर, खेड आणि चाकण, या ठिकाणांवरून फिरता फिरता स्मिथसाहेबाला हुलकावण्या दाखवीत आणि झुकांड्या देत बाजीरावसाहेब फिरून पुण्याकडे परत आले, आणि ते फिरून पुणे शहर काबीज करण्याच्या अगदी बेतात होते,

के शि म परांजपे हुलकावण्यांचे स्पष्टीकरण कसे देतात ते पहा-

“यावरून या हुलकावण्या दाखविण्यामध्ये त्यांनी जे कौशल्य प्रकट केले, त्याचे महत्त्व कोणाच्याही लक्षात येण्यासारखे आहे. पाठलाग करणाऱ्या आपल्या शत्रूला त्यांनी अगदी जेरीस आणले होते. इतक्या दीड महिन्याच्या अवकाशात सुमारे दहा बारा ठिकाणच्या मुक्कामात आणि एकंदर सुमारे ४०० मैलांच्या प्रवासात स्मिथसाहेब एकदाही गाठू शकला नाही. इतके दिवस इतके मैलांचा पाठलाग करून त्यात एकदा सुध्दा यश प्राप्त होऊ नये, ही इंग्लिशांना अत्यंत नामुष्कीची गोष्ट आहे. पण त्या सगळ्याच्या पेक्षाही इंग्लिशांना जास्त नामुष्कीची लाट ही आहे की, इंग्लिशांचे इतके सैन्य बाजीराव साहेबांच्या पाठीवर असताना त्यांनी जर लष्करी धोरणाच्या दृष्टीने एखादी मुख्य गोष्ट करावयाला पाहिजे होती ती ही की, त्यांनी बाजीरावाला फिरून पुण्याकडे यावयाला नको होते. जी गोष्ट इंग्लिशांनी करू द्यावयाला नको होती, ती गोष्ट बाजीराव आणि गोखले यांनी इंग्लिशांच्या पाठलाग करणाऱ्या सैन्याला खडे चारून आणि त्यांना न जुमानता हटकून घडवून आणिली, यात बाजीराव आणि बापू गोखले यांच्या लष्करी धोरणाचा आणि लष्करी दूरदृष्टीचा

खात्रीने विजय झालेला होता, असे कोणाही नि:पक्षपाती मनुष्याला कबूल करणे भाग आहे. दीड महिन्यात इंग्लिश सैन्य काहीएक करू शकले नाही; रानोमाळ फिरून उगीच थकून मात्र गेले. अखेरीस जड तोफा जलदीच्या पाठलागाला अडथळा करतात, म्हणून त्या तोफाही स्मिथसाहेबाने शिरूरला ठेवून पाहिल्या. तरी पण अखेरीस तो पेशव्यांच्या पुण्याकडील रोखाला प्रतिबंध करू शकला नाही तो नाहीच ! आणि पेशव्यांचे सैन्य मात्र दक्षिण, उत्तर, पूर्व, पश्चिम अशा निरनिराळ्या दिशांनी घिरट्या घालीत-घालीत आणि इंग्लिशांच्या सैन्याला चुकवीत चुकवीत नेमके पुण्याजवळच्या चाकणला येऊन पोहोचले ! या बाबतीत बाजीरावाने दाखविलेल्या कौशल्याबद्दल खुद्द इंग्लिशांनीही त्याची स्तुती केलेली आहे. बाजीरावांनी या प्रसंगी 'गनिमीकाव्याची' पध्द्त स्वीकारली होती. पाठीमागून पाठलाग करीत येणाऱ्या शत्रूला फसविण्याकरिता आणि त्याला भलत्याच दिशेकडून वळवून देण्याकरिता बाजीरावसाहेब हे आपल्या सैन्यातील काही लोक पाठीमागे एका दिशेला ठेवून आपण पुढे निराळ्याच दिशेने दुसरीकडे कोठे तरी कूच करून जात असत. त्यांच्या सैन्यात या वेळी तोफा वगैरेंसारखे जड सामान फारसे नसून त्यांनी आपल्या भोवती बहुतेक घोडेस्वारांचाच भरणा ठेविला होता व त्यांच्या सैन्यात घोडेस्वारच असल्यामुळे लांब लांब मजल मारून शत्रूला झुकांड्या देण्याला त्यांना फारच सोईचे पडत असे. मागे जे सैन्य ठेविलेले असे, ते अमुक दिशेला जात आहे, असे पाहून बाजीरावसाहेबही त्याच दिशेने जात असले पाहिजेत, असे वाटून इंग्लिश सैन्य पुष्कळ वेळा फसत असे; आणि हे पाठलाग करणारे इंग्रजी सैन्य जवळ आले, म्हणजे पेशव्यांचे मुद्दाम मागे ठेवलेले लोक

तेथून पळून निघून जात असत. पण पाठीमागे ठेविलेल्या बाजीराव साहेबांच्या पिछाडीचे संरक्षण करण्याकरिता बापू गोखले हे आपल्या सैन्यासह चालत असत. त्यांच्यावर शत्रुच्या सैन्याने हल्ला केला असता पेशव्यांना दूरवर जाण्याइतका वेळ मिळेपर्यंत किरकोळ लढाई करून नंतर ते दुसऱ्याच कोणत्या तरी दिशेने जात व फिरून पेशव्यांच्या सैन्याला येऊन मिळत असत." ही जी गमिनीकाव्याची पध्दत बाजीरावसाहेबांनी त्या वेळी स्वीकारली होती, आपला पाठलाग करणाऱ्या इंग्रज शत्रुना फसवीत फसवीत बाजीरावसाहेब ता. ३० डिसेंबर रोजी पुण्यापासून आठ नऊ कोसांवर चाकण मुक्कामी येऊन दाखल झाले. ही बातमी पुण्यास कळताच पुण्यातील लोकांचा आनंद गगनात मावेनासा झाला. आपला राजा फिरून आपल्यामध्ये येणार आणि आपले गेलेले स्वातंत्र्य आपल्याला फिरून मिळणार, असा संभव दिसू लागल्याबरोबर पुण्यातील स्वामिभक्त लोकांची चित्तवृत्ती आनंदाने किती उचंबळून गेली असेल, याची कल्पनाही करता येणे शक्य नाही ! सर्व लोक बाजीरावाच्या भाग्याची आणि बापू गोखल्यांच्या शौर्याची वर्णने गाऊ लागले. फक्त आपल्या फंदफितुरीने, हरामखोरीने आणि विश्वासघाताने पेशव्यांचे राज्य बुडवून इंग्रजांना आपल्या घरात घेण्याला ज्यांनी मदत केली होती, अशा देशद्रोही लोकांचे मात्र धाबे दणाणून गेले व आता बाजीरावसाहेब परत पुण्याला आले, तर आपल्या पातकाबद्दल आपल्याला काय शासन होईल, याबद्दल त्यांना भीती वाटू लागली."

दुसरी फेरी

दुसऱ्या फेरीतील धावतीचा पहिला तुकडा

१. १ जानेवारी १८१८ कोरेगाव भीमा - राजेवाडी - माहुलीत १७१ किमी. सातारकर गादी वारसांना सहकुटुंब बरोबर घेऊन निघाले.

१ जानेवारी 1818 रोजी कोरेगाव येथे इंग्लिशांच्या सैन्याचा पेशव्यांच्या करने पराभव केल्यानंतर 'श्रीमंतांच्या फौजेपेकी दहा पाच हजार फौज नारो विष्णु आपटे घेऊन वाघोली पावेतो आले. तेव्हा पुण्यामध्ये इंग्रज यांची पळण्याची तयारी झाली' असे बखरकारांनी लिहिले आहे. वाघोली हे गाव पुण्यापासून फक्त दोन-तीन कोसांवरच आहे; आणि कोरेगावास इंग्लिशांवर विजय मिळविलेल्या मराठ्यांच्या फौजेपैकी दहापाच हजार फौज नारोपंत आपटे यांच्या हाताखाली पुण्याच्या रोखाने येत असलेली ऐकून पुण्यातील इंग्रज लोकांची गाळण उडावी आणि त्यांनी पळण्याची तयारी करावी, हे अगदी स्वाभाविक होते.







परंतु पेशव्यांच्या काही फौजा जरी लोणीकंद आणि वाघोली येथपर्यंत येऊन पोहोचल्या होत्या, तरी पेशव्यांची मुख्य फौज कोरेगावहून राजेवाडीच्या मुक्कामाकडे गेली व तेथून पेशव्यांनी आपला मोर्चा साताऱ्याकडे वळविला. याच्यापूर्वी सातारच्या राजांना

वासोट्याच्या किल्ल्यात अटकेत ठेवण्यात आलेले होते. पण पुढे त्यांना तेथून आणवून पेशव्यांनी आपल्याबरोबर घेतले होते व त्यांना आपल्या स्वारीत आपल्याबरोबर घेऊन पेशवे कूच करीत असत.

दुसऱ्या फेरीतील धावतीचा दुसरा तुकडा

२. सातारा - कराड - मिरज - कर्नाटकातील काही गावे - कुडची - अथणी- जत - पंढरपूर जवळ दुसऱ्यांना - अष्टी किवा आत्ताचे सरकोळीत अंतर ३५५ किमी. ता १९ फेब्रूवारी १८१८ पर्यंत भामा कोरे गाव ते सरकोळी एकूण ४६८ किमी. गणिताला सोपे म्हणून ५० दिवसात ४५० किमी धरले तर जर रोज सरासरी ९ किमी पेक्षा कमी वेगाने जाऊ शकले. १५ दिवसाची विश्रांतीचे धरले तर ३५ दिवसात सरासरी १३ ते १५ किमी वेग पडतो असे मानायला हरकत नाही.

साताऱ्याहून श्रीमंतांची स्वारी निघाली, ती कर्नाटकामध्ये शिरली व तेथून त्यांनी अनेक ठिकाणी प्रयाणे केली. या वेळी इंग्लिश सैन्याच्या निरनिराळ्या टोळ्या त्यांचा पाठलाग करीत होत्या; पण त्या सगळ्या पाठलागात इंग्लिशांना कोठेही म्हणण्यासारखे यश आले नाही. पेशव्यांच्या सैन्यापैकी काही सैन्य इंग्रजी लष्करापुढे दोन तीन कोसांवर असे; आणि काही सैन्य त्यांच्या लष्कराच्या पाठीमागे दोनतीन कोसांवर असे. अशा रीतीने पेशव्यांच्या दोन सैन्यांच्या कचाटीमध्ये बहुतेक वेळा इंग्लिशांचे सैन्य सापडलेले असे.

संगम महुलि, सातारा, महाराष्ट्र 4
कराड रोड, महाराष्ट्र
मिरज रेल्वे स्टेशन, पंढरपूर वाल,
कुडची, कर्नाटक 591311
अथणी, कर्नाटक
जत, महाराष्ट्र 416404
सांगोला, महाराष्ट्र 413307
पंढरपूर, महाराष्ट्र 413304
सर्कोळी, महाराष्ट्र 413304




त्यामुळे त्यांना फारसे काही करता येत नसे. परंतु अशा रीतीने जरी पेशव्यांचे सैन्य बाजीरावसाहेबांचे संरक्षण करीत एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी कूच करीत असे, तरी त्यांनी अशा या निरर्थक प्रयत्नांमध्ये तरी किती दिवस काढावयाचे ? त्यांना असा या भुरट्या लढायांचा अखेरीस अखेरीस कंटाळा येऊ लागला व एकदा इंग्रजाचा कोठे तरी गाठून त्याच्याशी एखादी मोठी लढाई द्यावी, असे पेशव्यांच्या सर्व सरदारांना वाटू लागले. निपाणीजवळ ही लढाई द्यावी, असे एकदा त्यांनी ठरविले. पण ठरलेल्या वेळी त्या ठिकाणी सगळीकडच्या मराठी सैन्याची जमवाजमव झाली नाही, म्हणून निपाणीचा बेत रहित करण्यात आला. पहे. फेब्रुवारी महिन्यात सोलापूरनजीक कोठे तरी हा लढाईचा बेत जुळवून आणावा असे

ठरविण्यात आले. बापू गोखले यांच्या चरित्रात याबद्दलची हकिकत दिलेली आहे ती अशी की, "शेवटी प्रसंगी सर्व सरदारांचा बेत असा ठरला होता की, सोलापूर येथे इंग्रजांशी मोठी लढाई द्यावी. सरदारांस पळण्याचा फारच कंटाळा आला होता. त्या बेताप्रमाणे पानशांचा तोफखाना सोलापुरी रवाना झाला होता. पटवर्धनमंडळीही सोलापुरास आली होती. बापू गोखल्यांजवळच्या, गोसाव्यांच्या व अरबांच्या पलटणी सर्व तयार होऊन राहिल्या. ही लढाई झाली असती, तर इंग्रजांस कदाचित् तोंड मागे फिरविणे भाग पडले असते. कारण, या वेळी लढाईची सर्व तयारीच मोठी विलक्षण होऊन राहिली होती.” परंतु हा सोलापूरच्या लढाईचाही योग जुळून आला नाही. बाजीरावसाहेबांचा मुक्काम तेथून हालला आणि ता. १९ फेब्रुवारी १८१८ या दिवशी संध्याकाळी त्यांचा मुक्काम पढरपुराजवळील गोपाळाची अष्टी या गावी येऊन पडला.

ब्रिगेडिअर जनरल स्मिथ यांच्या हाताखालील फोर्थ डिव्हिजनमधील लष्कर पेशव्यांचा पाठलाग करीत मागाहून येतच होते. ते ता. २० फेब्रुवारी रोजी सकाळी पेशव्यांच्या सैन्यापासून दोनतीन कोसांच्या अंतरावर येऊन पोहोचले असता पेशव्यांच्या छावणीतील नगारे वाजत असलेले त्यांना ऐकू आले. व आता पेशव्यांचे सैन्य अगदी जवळ असले पाहिजे, असे जाणून जनरल स्मिथ याने लढाई करण्याचा निश्चय केला. बापू गोखल्यांच्या बातमीदारांनी इंग्रजांचे लष्कर अगदी जवळ येऊन ठेपले आहे, ही बातमी बापू गोखल्यांना सांगितली.

दुसऱ्या फेरीतील धावतीचा तिसरा तुकडा

३. २१ फेब्रुवारी ते जून १८१८ दरम्यान मराठ्यांच्या गडावरील किल्लेदार सोडता उरलेले सरदार पांगून सोलापूर, परांडा, निपाणी, मिरज भागात गायब झाले. ३ जून १८१८ ला बाजीरावांनी धुळकोट येथे रीतसर शरणागती पत्करली.

ते सरदार कोणत्या वाटांनी कसे पळाले या बाबत कै शि म परांजपेंच्या पुस्तकात मौन आहे.

पुढे चालू...